**गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत पीएच.डी करण्याकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्याबाबत.**
**(श्रीमती जननी नटराजन,अधिव्याख्याता, अणुविद्युत अभियांत्रिकी, सेंट झेविअर्स टेक्निकल इन्स्टिट्यूट, मुंबई (अनुदानित संस्था))**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-३५१९/प्र.क्र.४३/१९/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०५ नोव्हेंबर, २०१९.

वाचा :

१. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्रमांक: प्रतिनि-२०९५/१९५५७/ (१९५/९५)/तांशि-४, दि. २० नोव्हेंबर, १९९६.
२. शासन निर्णय,उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्रमांक: प्रतिनि-२०९५/१९५५७/१९५/९५)/तांशि-४, दि. २८ ऑक्टोबर,१९९८.
३. तंत्रशिक्षण संचालनालयाचे क्र.४अ/आस्था/ पीएच.डी/प्रतिनि/२०१९-२०/१९५, दि.३० एप्रिल, २०१९ रोजीचे पत्र.

**शासन आदेश:**

श्रीमती जननी नटराजन,अधिव्याख्याता, अणुविद्युत अभियांत्रिकी, सेंट झेविअर्स टेक्निकल इन्स्टिट्यूट, मुंबई (अनुदानित संस्था) यांची “नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, तिरूचिरापल्ली” या संस्थेमध्ये गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत उच्च शिक्षणासाठी (पीएच.डी.अभ्यासक्रम) सन २०१९-२०२० या शैक्षणिक वर्षापासून ०३ (तीन) वर्षे कालावधीसाठी निवड झालेली आहे.

२. श्रीमती जननी नटराजन यांना कार्यरत संबंधित संस्थेतील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होणार नाही व खालील नमूद अटीं व शर्तींच्या अधिन राहून उच्च शिक्षणाकरीता त्यांची निवड झालेल्या संस्थेमध्ये प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१) प्रतिनियुक्ती पूर्ण निर्धारित कालावधीकरिता असेल.
२) श्रीमती जननी नटराजन यांना खालील अट क्र.७ चे अधिन राहून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालखंडात नियमानुसार अनुज्ञेय असलेले वेतन व भत्ते देय राहतील.
३) त्यांच्या वेतनाव्यतिरिक्त ज्या संस्थेत प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले त्या संस्थेने त्यांना विद्यावेतन शिष्यवृत्ती दिल्यास ती स्विकारण्यास त्यांना परवानगी देण्यात येत आहे.
४) प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी जाण्यासाठी किंवा प्रतिनियुक्तीच्या कालावधीत तसेच प्रतिनियुक्ती संपल्यावर मुख्यालयात परत येण्यासाठी त्यांना प्रवासभत्ता वा दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.
५) श्रीमती जननी नटराजन यांना त्यांच्या उर्वरित सेवा कालावधीत कधीही अध्ययन रजा घेता येणार नाही व तसे बंधपत्र प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी त्यांना कार्यालयाकडे द्यावे लागेल.
६) संबंधित अभ्यासक्रमासाठी करारनिर्दिष्ट काळापेक्षा जास्त कालावधी वाढवून मिळण्यास त्यांनी अर्ज केल्यास प्रतिनियुक्तीच्या वाढलेल्या कालावधीसाठी त्यांची देय व अनुज्ञेय रजा समजण्यात येईल.
७) प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर कार्यरत संस्थेची सलग ०६ वर्षे सेवा करण्याचे बंधपत्र त्यांना प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी द्यावे लागेल. हे बंधपत्र त्यांना शासन पत्र सामान्य प्रशासन विभाग

क्र. एसआरव्ही १०६८/डी-१०/, दि. १५/१०/१९९८ व शासन ज्ञापन सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०६९, दिनांक २१/०६/१९७९ मध्ये विहीत केल्याप्रमाणे संबंधित प्राचार्यांमार्फत संचालक, तंत्रशिक्षण यांचेकडे सादर करावे लागेल.

८) श्रीमती जननी नटराजन या जर त्यांचे प्रशिक्षण अर्धवट सोडून येतील किंवा बंधपत्राप्रमाणे संस्थेत सेवा करणार नसतील, तर त्यांच्याकडून शासनाने त्यांच्यावर केलेला संपूर्ण खर्च प्रचलित व्याजदरासह वसूल करण्यात येईल.

९) प्रतिनियुक्तीचा कालावधी सेवा काळ म्हणून समजण्यात यावा.

१०) सदर प्रशिक्षणासाठीची प्रतिनियुक्ती त्यांच्यापेक्षा ज्येष्ठ असलेल्या कर्मचा-यांच्या अगोदर पदोन्नतीसाठी आधारभूत ठरु शकणार नाही.

३. श्रीमती जननी नटराजन यांना प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करण्यापूर्वी उपरोक्त परिच्छेद २(५) व (७) येथे नमुद बाबींवरील बंधपत्रे संबंधित अध्यापकाकडून घेण्याची संबंधित संस्था प्रमुखांनी दक्षता घ्यावी. तसेच त्यांना सदर संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

४. असे प्रमाणित करण्यांत येते की, श्रीमती जननी नटराजन यांना गुणवत्ता दर्जा सुधार कार्यक्रमानुसार पीएच.डी अभ्यासक्रमासाठी पाठविण्यांत आले नसते तर, वरील अभ्यासक्रमाच्या काळात त्याच पदावर स्थानापन्न राहील्या असत्या.

५. सदर आदेश संदर्भाधीन क्र.१ व २ येथे नमूद शासन निर्णयामधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०८११४८१८४९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2019.11.08 11:54:33 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

श्रीमती जननी नटराजन, अधिव्याख्याता, अणुविद्युत अभियांत्रिकी, सेंट झेविअर्स टेक्निकल इन्स्टिट्यूट, मुंबई (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत:-**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई,
३. सहसंचालक, विभागीय कार्यालय,मंबई.(तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
४. प्राचार्य, सेंट झेविअर्स टेक्निकल इन्स्टिट्यूट ,माहिम, मुंबई (तंत्रशिक्षण संचालनालया मार्फत),
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवड नस्ती-तांशि-७.